मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्य अंतर्गत छत्रपती संभाजीनगर जिल्ह्यातील १४ रस्त्यांची दर्जोन्नती करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

## महाराष्ट्र शासन

### ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.४६/बांधकाम-४

बांधकाम भवन, ५ वा मजला, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

तारीख: १३ मार्च, २०२३

वाचा :

१) **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८ ऑक्टोबर, २०१५.

२) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२१/प्र.क्र.१६५/बांधकाम-४, दिनांक ०६ जानेवारी, २०२२.

३) **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२२/प्र.क्र.०७/बांधकाम-४, दिनांक २१ एप्रिल, २०२२.

४) **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२२/प्र.क्र.१९/बांधकाम-४, दिनांक २६ सप्टेंबर, २०२२.

५) **शासन पत्र, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२२/प्र.क्र.४६९/बांधकाम-४, दिनांक २० ऑक्टोबर, २०२२.

६) **मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांकः** मु.अ./प्रमंग्रासयो/१३४/२०२३, दिनांक १० जानेवारी, २०२३.

७) **मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांकः** मु.अ./प्रमंग्रासयो/१८५/२०२३, दिनांक १० जानेवारी, २०२३.

**शासन निर्णय :**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्य अंतर्गत छत्रपती संभाजीनगर जिल्ह्यातील रस्त्यांची दर्जोन्नती करण्यासाठी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या किंमतीस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>तालुका</th><th>पॅकेज क्रमांक</th><th>रस्त्याचे नाव</th><th>लांबी (कि.मी.)</th><th>कामाची अंदाजीत रक्कम (रू. लक्ष)</th><th>कामाची ५ वर्षे नियमित देखभाल व दुरुस्ती अंदाजित रक्कम (रु. लक्ष)</th></tr>
<tr><td>१</td><td rowspan="2">पैठण</td><td rowspan="2">ADB-AUR-((II))-०१</td><td>प्रजिमा -३४ ते नानेगाव - पुसेगाव खेर्डा - खेर्डा तांडा रस्ता</td><td>५.७७०</td><td>६६२.०८</td><td>५४.६८</td></tr>
<tr><td>२</td><td>इजिमा -४३ ते गाढेगाव गंगापूर रस्ता</td><td>४.९३०</td><td>४६७.८९</td><td>३८.६४</td></tr>
<tr><td>३</td><td rowspan="2">पैठण</td><td rowspan="2">ADB-AUR-(II)-०२</td><td>राममा -७५२ ते हनुमंतवाडी दादेगाव जागीर (जुने) दादेगाव जागीर (नवे) रस्ता</td><td>७.५७०</td><td>८११.६२</td><td>६७.०४</td></tr>
<tr><td>४</td><td>रामा -२६ ते नायगाव रस्ता</td><td>५.१५०</td><td>४७८.५३</td><td>३९.५३</td></tr>
<tr><td>५</td><td>वैजापूर</td><td>ADB-AUR-(II)-०३</td><td>राममा - २५२ H नांदगाव- चांडगाव लाख खंडाळा तेबिलोणी रस्ता</td><td>१०.४००</td><td>९५२.३१</td><td>७८.६६</td></tr>
<tr><td>६</td><td rowspan="2">गंगापूर</td><td rowspan="4">ADB-AUR-(II)-०४</td><td>प्रजिमा -४३ ते पुरी रोड रस्ता</td><td>४.०००</td><td>३०६.५०</td><td>१९.५४</td></tr>
<tr><td>७</td><td>प्रजिमा - ३२ ते हैबतुपर - अंबेगाव रस्ता</td><td>८.१००</td><td>६६१.३१</td><td>४२.१५</td></tr>
<tr><td>८</td><td rowspan="2">खुलताबाद</td><td>राममा -७५२ ते देवळाणा (बु) हरीजन वस्ती रस्ता</td><td>४.८००</td><td>३०५.४१</td><td>१९.४४</td></tr>
<tr><td>९</td><td>इजिमा- ३० ते निर्गुडी (बु.) रस्ता</td><td>३.३५०</td><td>२५३.९५</td><td>१६.१८</td></tr>
<tr><td>१०</td><td rowspan="2">कन्नड</td><td rowspan="2">ADB-AUR-(II)-०५</td><td>रामा ५१ (कन्नड) ते गराडा रस्ता</td><td>४.०००</td><td>४१८.९८</td><td>२४.९५</td></tr>
<tr><td>११</td><td>प्रजिमा-९७ (कन्नड) ते रीठ्ठी-मोहरडा रस्ता</td><td>४.८००</td><td>४५४.२६</td><td>२६.७१</td></tr>
<tr><td>१२</td><td>सोयगाव</td><td rowspan="2">ADB-AUR-(II)-०६</td><td>नांदा ते नांदातांडा - चारुतांडा रस्ता</td><td>४.३००</td><td>४३२.१८</td><td>२७.७२</td></tr>
<tr><td>१३</td><td>सिल्लोड</td><td>कायगाव गवाळी तलवाडा ते गवाळी तांडा रस्ता</td><td>९.६००</td><td>६९७.०२</td><td>४१.९७</td></tr>
<tr><td>१४</td><td>फुलंब्री</td><td>ADB-AUR-(II)-०७</td><td>रामा-४८ ते प्रजिमा -१११ (वाहेगाव) रस्ता</td><td>३.८५०</td><td>३६५.५०</td><td>२०.६५</td></tr>
<tr><td colspan="4">**एकुण १४ कामे**</td><td>८०.६२०</td><td>७२६७.५४</td><td>५१७.८६</td></tr>
</table>

१. सदर कामे ग्रामविकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेच्या धर्तीवर व ग्रामविकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.

२. मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), पुणे, संबंधित अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) व संबंधित कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) यांनी शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांक ग्रासयो-२०१८/प्र.क्र.२३९/बांधकाम-१, दि.२५.१०.२०१८ तसेच शासन पत्र क्रमांक मुग्रायो

२०१९/प्र.क्र.७३/बांध-४ दिनांक २२ जानेवारी,२०१९ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार प्रत्येक रस्त्याला तांत्रिक मान्यता द्यावी.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था व मुख्य अभियंता तसेच संबंधित अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) यांनी रस्त्याचे दर्जोन्नती करण्यासाठी ई-टेंडरिंग करुनच कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.

४. प्रस्तुत कामास तांत्रिक मंजुरी देण्यापुर्वी व काम सुरु करण्यापुर्वी पुढील बाबींची पुर्तता करण्यात यावी.

i) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापुर्वी रस्त्याच्या कामाचा वाव, Pavement Design व Hydraulic Calculations पुनश्चः काटेकोरपणे तपासण्यात येवुन त्याप्रमाणे संकल्पन निश्चित करण्यात यावे.

ii) सदर रस्त्यासाठी लागणारी जमीन या विभागाच्या ताब्यात आहे याची खातरजमा करुन घ्यावी.खाजगी जमीन अथवा वनविभागाची ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक असलेल्या रस्त्यांची कामे हाती घेण्यात येवुन येत,याबाबत पुनःश्चखात्री करण्यात यावी.

iii) तांत्रिक मान्यता देणाऱ्या प्राधिकाऱ्याने हे काम कोणत्याही पाटबंधारे / जलविद्युत पाणीपुरवठा प्रकल्पाच्या जलाशयाखाली जाण्याची शक्यता नाही किंवा अशा प्रकल्पांमुळे या कामावर कोणताही परिणाम होणार नाही याची खात्री करावी.

iv) अंदाजपत्रकामध्ये कामाची मराठीमधुन माहिती दर्शविणाऱ्या फलकाची तरतुद केलेली असावी.

v) प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात प्रत्येक दराचे वर्णन / दर / दरपृथ:करण / रक्कम / दरपृथ:करणाती गृहित धरलेली अंतरे व अनुषंगिक इतर बाबी तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्यांनी त्यांच्या पातळीवर तपासणे अनिवार्य आहे.या संदर्भात शासनाचे कोणतेही उत्तरदायित्व असणार नाही.

vi) तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याने कामामध्ये प्रस्तावित वाव अन्य कोणत्याही योजनेत / कार्यक्रमात समाविष्ठ नाही तसेच सार्वजनिकबांधकाम विभाग, जिल्हा परिषद, महानगरपालिका, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ इत्यादी तत्सम यंत्रणेकडे मंजुर नाही, याची खातरजमा करावी.

vii) सदर कामांना प्रचलित दरसूचीनुसार तांत्रिक मंजूरी देण्यात यावी.

viii) सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.

ix) सदर कामे डोंगरी / आदिवासी / नक्षलप्रभावीत क्षेत्र अथवा साखर कारखान्यापासून १५ कि.मी.त्रिज्या क्षेत्रांमध्ये शासनाच्या प्रचलित निर्णयानुसार येत असल्याबाबत तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्यांने तपासणी करुन दरपृथ:करणामध्ये त्यानुसार

तरतुद केले बाबत खातर जमा करावी. याबाबतची सर्व जबाबदारी ही संबंधित तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकारी/ अभियंत्याची राहील.

**०२.** सदर कामावरील खर्च अ) बाहय हिस्स्यासाठी लेखाशिर्ष "मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (०२) बाहय सहाय्यित प्रकल्प (०२) (०१) अशियायी विकास बँक सहाय्यित ग्रामीण रस्ते विकास पायाभूत सुविधा प्रकल्प (बाह्यहिस्सा ७० %) (कार्यक्रम) ५३ मोठी कामे सी.आर.सी. ५०५४ ५२९८ व (ब) राज्य हिस्स्यासाठी लेखाशिर्ष "मागणी क्र. एल-०७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (०२) बाहय सहाय्यित प्रकल्प (०२) (०२) अशियायी विकास बँक सहाय्यित ग्रामीण रस्ते विकास पायाभूत सुविधा प्रकल्प (राज्य हिस्सा ३० %) (कार्यक्रम) ५३ मोठी बांधकामे, सी आर सी- ५०५४ ५३०४" या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१३१७०१२१८७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.03.15 12:45:50 +05'30'

**(प्रशांत. वि. पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (ग्रा.वि.) मंत्रालय, मुंबई.
४) मा.विधानसभा सदस्य, मा. विधानपरिषद, सदस्य.
५) अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, छत्रपती संभाजीनगर.
९) खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.) मंत्रालय मुंबई-३२.
१०) मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.

११) अधीक्षक अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
१२) कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.),महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, छत्रपती संभाजीनगर.
१३) कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, छत्रपती संभाजीनगर.
१४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, छत्रपती संभाजीनगर.
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर.
१६) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
१७) निवड नस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.